**कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीचे हस्तातंरण मदत व पुनर्वसन (महसूल व वन विभाग) मंत्रालय, मुंबई याचेकडे करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:कोभूपु-१५२३/प्र.क्र.०१/का.५(नासंस)**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक ०१/०३/२०२३

<u>संदर्भ</u>:-१) **शासन निर्णय क्रमांक:कोभूपु-२०२०/प्र.क्र.०८/२०२०/का.५(नासंस) दिनांक २७/०८/२०२०.**
**२) शासन पत्र क्र.कोभूपुनिस-१५२३/प्र.क्र.०१ का-५ (ना.सं.स) दिनांक ०३/०२/२०२३.**

**<u>प्रस्तावना</u>:-**

दिनांक ११ डिसेंबर १९६७ रोजी कोयना परिसरात झालेल्या भुकंपामुळे पिडीत व्यक्तींचे/ कुटूंबाचे व तेथील दुर्गम भागाचे पुनर्वसन करण्यासाठी मा.मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली, "कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीची " स्थापना करण्यात आली आहे. त्यामध्ये मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य हे या समितीचे पदसिध्द अध्यक्ष असून मा.मुख्य सचिव हे पदसिध्द विश्वस्त तसेच उपसचिव/सहसचिव,सा.प्र.वि./का.५ हे देखील पदसिध्द विश्वस्त व सचिव आहेत. उपरोक्त समितीच्या नियम व विनियमातील तरतुदीनुसार न्यासाच्या एकूण विश्वस्तांपैकी ३ पदसिध्द विश्वस्त वगळता उर्वरित ६ सदस्यांची निवड कोयना भुकंपग्रस्त तालुक्यातील विधानसभा सदस्यातून करण्यात येते. तसेच २ सन्माननीय विधानसभा सदस्यांचा आमंत्रित सदस्य म्हणून समावेश करण्यात येतो. त्याअनुषंगाने संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे.

कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीची मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११ जानेवारी २०२३ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. समितीकडे पर्याप्त कर्मचारीवृंद व यंत्रणा नसल्याने कामावर परिणाम होत असल्याने सदर समितीचे हस्तांतरण मदत व पुनर्वसन (महसूल व वन विभाग) मंत्रालय,मुंबई यांचेकडे करण्याचा निर्णय उपरोक्त बैठकीमध्ये घेण्यात आला.त्याअनुषंगाने कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीचे हस्तांतरण मदत व पुनर्वसन (महसूल व वन विभाग ) यांचेकडे करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या प्रशासकीय नियत्रंणात असलेल्या कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीचे हस्तांतरण मदत व पुनर्वसन (महसूल व वन विभाग) मंत्रालय,मुबंई यांचेकडे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीचे बँक ऑफ बडोदा मध्ये बचत खाते असून सध्या कोषाध्यक्ा (मा.मंत्री, उत्पादन शुल्क) आणि सदस्य सचिव तथा सह सचिव, कार्यासन साप्रवि- ५ यांचे संयुक्त नावे असलेले बचत खाते कोषाध्यक्ष (मा.मंत्री उत्पादन शुल्क) आणि सदस्य सचिव तथा उप/सहसचिव (मदत व पुनर्वसन) यांच्या संयुक्त नावे हस्तांतरीत करण्यात यावे.

३. कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीच्या कामासाठी उपलब्ध असलेले उपलेखापाल (लेखा व कोषागारे) यांच्या सेवा नागरिक संरक्षण समिती अंतर्गत कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीसाठी घेण्यात आलेल्या

आहेत. उपरोक्त समितीच्या हस्तांतरणाच्या निर्णयाच्या अनुषंगाने उपलेखापाल पदाच्या सेवा मदत व पुनर्वसन विभागाकडे हस्तांतरीत करण्यात याव्यात त्याबाबतचे आदेश संचालक, लेखा व कोषागारे कार्यालय यांच्याकडून निर्गमित करण्यात यावेत.

४. कोयना भूकंप निधी पुनर्वसन समितीचे उपलब्ध दस्ताऐवज, कागदपत्र व नस्त्या औपचारीक रित्या मदत व पुनर्वसन विभागास हस्तांतरीत करण्यात यावे.

सदर शासन निर्णय ,महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११३३२२५६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: CN = LAXMIKANT GOPALRAO DHOKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.03.01 13:38:32 +05'30'

**(ल.गो.ढोके)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय मुंबई,
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
४. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता,विधान परिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई,
६. सर्व मा. विधानसभा/विधान परिषद,
७. कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीचे सर्व मा. विश्वस्त,
८. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२
९. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१०. प्रधान सचिव ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई,
११. जिल्हाधिकारी रत्नागिरी,सातारा
१२. महालेखापाल(लेखा परीक्षा)-१/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) )-१/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१४. महालेखापाल(स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा)महाराष्ट्र,मुंबई-३२
१५. संचालक,लेखा व कोषागार,कस्तुरी बिल्डिंग,पेट्रोल पंप हाऊसच्या समोर,मुंबई,
१६. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई,
१७. सहसचिव (र.व का.) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८. अवर सचिव (कार्यासन-५)साप्रवि मंत्रालय,मुंबई,
१९. प्रत संग्रहार्थ.